**महाराष्ट्र - कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांना निवृत्ती वेतनात वाढ देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : बियुडी-१८१४/प्र.क्र.९६/२०१४/३६**

मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : २१ एप्रिल, २०१५

**संदर्भ :-**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मकसी/हुस्माक/१०९६/प्र.क्र.१४/९६/३६, दि.१७/१०/१९९७.

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मकसी-१०९७/प्र.क्र.५४/९७/३६, दि.०८/०१/१९९९.

३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.संकीर्ण-२०१०/प्र.क्र.५९/१०/स्वासैक-१, दि.०७/१२/२०१०

४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, मकसी-१०१०/प्र.क्र.९१/२०१०/३६, दि.२९/०३/२०११.

५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.निवृवे-२०१२/प्र.क्र.११९/२०१२/स्वासैक-१, दि.०३/०९/२०१४.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र - कर्नाटक सीमा आंदोलनात ज्या व्यक्तींनी बलिदान दिले आहे त्यांना हुतात्मे म्हणून घोषित करुन त्यांच्या कुटुंबियांना (हयात विधवा पत्नी, आई व वडील यापैकी एक) रुपये १०००/- मासिक निवृत्तीवेतन व इतर आर्थिक लाभ (स्वातंत्र्य सैनिकांना मिळणाऱ्या लाभांप्रमाणे) देण्याचा शासन निर्णय दि.१७/१०/१९९७ रोजी निर्गमित करण्यात आला आहे. त्यानंतर शासन निर्णय दि.०८/०१/१९९९ अन्वये, महाराष्ट्र-कर्नाटक सीमा आंदोलनामध्ये सीमावर्ती क्षेत्रात मृत्यु पावलेल्या व्यक्तींनाही हुतात्मा म्हणून घोषित करुन त्यांच्या कुटुंबियांना निवृत्तीवेतनात वाढ देऊन दरमहा रु.१५००/- इतके निवृत्तीवेतन व इतर आर्थिक लाभ (स्वातंत्र्य सैनिकांना मिळणाऱ्या लाभांप्रमाणे) मंजूर करण्यात आले आहेत. स्वातंत्र्यसैनिकांना मिळणाऱ्या निवृत्तीवेतनात वाढ झाल्यास सीमा आंदोलनातील हुतात्म्यांच्या

वारसांनादेखील त्याप्रमाणे वाढीव निवृत्तीवेतन मंजूर करण्यात येते. संदर्भाधीन दि.२९/०३/२०११ च्या शासन निर्णयान्वये, महाराष्ट्र - कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांना दि.०२/१०/२०१० पासून रु.८०००/- दरमहा इतके निवृत्तीवेतन देण्यात येत आहे.

२. संदर्भाधीन दि.०३/०९/२०१४ च्या शासन निर्णयान्वये राज्य शासनामार्फत स्वातंत्र्य सैनिकांना देण्यात येत असलेल्या रु.८०००/- दरमहा इतक्या निवृत्तीवेतनात रु.२०००/- ने वाढ करुन त्यांना रु.१०,०००/- दरमहा इतके निवृत्तीवेतन मंजूर करण्यात आले असून निवृत्ती वेतनातील ही वाढ दि.०२/१०/२०१४ पासून लागू करण्यात आली आहे. सबब, महाराष्ट्र-कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांच्या कुटुंबियांस स्वातंत्र्य सैनिकांप्रमाणेच वाढीव निवृत्तीवेतन मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

**१.** महाराष्ट्र - कर्नाटक सीमा आंदोलनात ज्या व्यक्तींनी बलिदान दिले आहे त्यांच्या वारसास (हयात विधवा पत्नी, आई व वडील यापैकी एक) स्वातंत्र्य सैनिकांप्रमाणेच, सध्या मिळणाऱ्या रु.८०००/- दरमहा इतक्या निवृत्तीवेतनात रु.२०००/- ने वाढ करुन **रु. १०,०००/- (रुपये दहा हजार फक्त) दरमहा** एवढे निवृत्तीवेतन अदा करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर वाढीव निवृत्तीवेतन हे **दि.०२ ऑक्टोबर,२०१४** पासून लागू करण्यात येत आहे.

**२.** निवृत्तीवेतन लाभ घेणाऱ्या लाभार्थ्यांना मिळणारा प्रवासखर्च व इतर आर्थिक सवलती पूर्वीप्रमाणेच राहतील. त्यामध्ये कोणताही बदल करण्यात आलेला नाही.

**३.** उक्त कारणास्तव होणारा खर्च **"मागणी क्र-ए.५, २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण, (६०) इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम (१०२) सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृती वेतन, (००) (०३) महाराष्ट्र - कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांना निवृत्ती वेतन, २२३५२४९३"** या लेखाशीर्षाखाली खर्ची घालण्यात यावा व **सन २०१५-१६** च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**४.** सदर शासन निर्णय, वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.१०९६/१४/व्यय-४, दि.२१/१२/२०१४ तसेच अनौपचारिक संदर्भ क्र.३६७/१५/व्यय-४, दि.२०/०४/२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१५०४२११६४६२९५६०७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(रि.इ.शेख)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
३. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
४. सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
५. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई-४०००३२.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
७. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर.
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१२.सहसंचालक, लेखा व कोषागारे (संगणक शाखा),५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई-४०००३२.
१३.प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१४.सचिव, लेखा व कोषागरे, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१५.संबंधित विभागीय आयुक्त.
१६.जिल्हाधिकारी, मुंबई शहर जिल्हा, जुने जकात गृह, फोर्ट, मुंबई-४०००२३.

१७.जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१.

१८. जिल्हाधिकारी, कोल्हापूर.

१९.जिल्हाधिकारी, पुणे.

२०.जिल्हाधिकारी, रत्नागिरी.

२१.जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर.

२२.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

२३.जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी.

२४.वित्त विभाग (अर्थसंकल्प-३ / अर्थसंकल्प-१३/ व्यय-४), मंत्रालय, मुंबई-४०००३२.

२५.सामान्य प्रशासन विभाग **(कार्यासन-२५),** मंत्रालय, मुंबई-४०००३२.

२६.विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई-४०००३२. (प्रसिध्दीसाठी)

२७.**भारतीय रिझर्व्ह बँक,** केंद्रिय कार्यालय, सहकारी बँक लेखा विभाग, केंद्रिय ऋण विभाग, सी-७, बांद्रा-कुर्ला संकुल, ३ रा मजला, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१ यांना, त्यांनी सर्व राष्ट्रीयकृत बँकांना आवश्यक त्या सूचना देण्याच्या विनंतीसह रवाना.

२८. निवड नस्ती (कार्या.३६).